केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत असंसर्गजन्य आजार (NCD Flexipool) कार्यक्रमांसाठी सर्वसाधारण योजनेंतर्गत सन २०१६-१७ मधील केंद्र हिश्श्यापोटी रू.२२२८.०० लक्ष (पहिला हफ्ता) अनुदान वितरीत करण्याबाबत

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः नीधी-२६१७/प्र.क्र.२९ /२०१७/आ-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : २७ मार्च, २०१७

वाचा :-

१) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७-२३/२०१६-NHM(Finance)/५, दिनांक ३०, सप्टेंबर २०१६ चे आदेश २००५.००
२) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७-२३/२०१६-NHM(Finance)/६, दिनांक ३०, सप्टेंबर २०१६ चे आदेश २२३.००
३) सहसंचालक(असंसर्गजन्य), आरोग्य सेवा, मुंबई यांचे जा.क्र.संआसे/NCD/अनुदान मागणी/General/१००-०५/२०१७, दिनांक ७ जानेवारी, २०१७ चे पत्र.

प्रस्तावना :-

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कार्यान्वित असलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी केंद्र शासनाने उपरोक्त आदेशान्वये असंसर्गजन्य आजारांशी संबंधित योजनांसाठी NCD Flexipool ६०% केंद्र हिश्श्यापोटी सर्वसाधारण वर्गवारी करिता सन २०१६-१७ साठी पहिला हफ्ता वितरीत केला असून सदर अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय :-

राज्यामध्ये राष्ट्रीय असंसर्गजन्य रोग नियंत्रण कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सर्वसाधारण (General) लाभार्थ्यांकरिता सन २०१६-१७ साठी ६०% केंद्र हिश्श्यापोटी रु. २२२८.०० लक्ष (रुपये बावीस कोटी अठ्ठावीस लाख फक्त) इतकी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, पुणे यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च मागणी क्र.आर-१, २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य; ८००- इतर खर्च; अंतर्गत खालीलप्रमाणे नमूद केलेल्या योजना निहाय या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१६-१७ साठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

| अ.क्र. | योजना | लेखाशिर्ष | वितरित निधी (रु.लाखात) |
|---|---|---|---|
| १ | NPCB | (०१) (२९) राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम केंद्र पुरस्कृत योजना (केंद्राचा हिस्सा ६० टक्के)<br>२२१०F२६४ - ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | ९४७.५५ |
| २ | NPCDCS | (०१) (४१) राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह, हृदयरोग व पक्षघात प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रम केंद्र पुरस्कृत योजना (केंद्राचा हिस्सा ६० टक्के)<br>२२१०F३८२ - ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | ९१२.९१ |
| ३ | NTCP | (०१) (३७) राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम केंद्र पुरस्कृत योजना (केंद्राचा हिस्सा ६० टक्के)<br>२२१०F३४४ - ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२७.८१ |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | NPHCE | (०१) (३३) राष्ट्रीय वृद्धापकाळ आरोग्य शुश्रुषा कार्यक्रम केंद्र पुरस्कृत योजना (केंद्राचा हिस्सा ६० टक्के)<br>२२१०F३०८ - ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | १०१.१५ |
| ५ | NMHP | (०१) (३१) राष्ट्रीय मानसिक आरोग्य कार्यक्रम केंद्र पुरस्कृत योजना (केंद्राचा हिस्सा ६० टक्के)<br>२२१०F२८२ - ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | ३८.५८ |
| | | | **२२२८.००** |

४. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३०२/अर्थ-९/अर्थोपाय, दिनांक २३ फेब्रुवारी, २०१७ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१६१५५६४८९७१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R More

Digitally signed by Sanjay R More
DN: CN = Sanjay R More, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.03.27 12:21:22 +05'30'

**( सं. रा. मोरे )**
**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.

२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, कु.क. कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
७. सहायक संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
८. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. वित्त विभाग ( अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१३.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१४.निवडनस्ती ( आरोग्य -७) .